

# हाय भगतसिंग , हाय हा ।

हाय भगतसिंग , हाय हा ।
जासी आजि फ़ांशी अम्हास्तवचि वीरा, हाय हा ।

राजगुरू तू , हाय हा ।
राष्ट्रसमरि, वीर कुमरा, पडसि झुंजत, हाय हा।

हाय हा, जय जय अहा।
हाय हायचि आजची, उदयीकच्च्या जिंकी जया।।

राजमुकुटा तो धरी
मत्युच्या मुकुटास आधी बांधी जो जन निजशिरी।

शस्त्र धरुचि अम्ही स्वतः
धरुनि जे तू समरि शत्रुसि मरसि मारित मारता।।

अधम तरी तो कोणता ?
हेतुच्या तव वीरतेची जो न बंदिल शुद्धता ।।

जा हुतात्म्यांनो अहा
साक्ष ठेवुनि शपथ घेतो आम्ही उरलो ते पहा ।

शस्त्रसंगर चंड हा
झुंजवुनी की, जिंकुची स्वातंत्र्यविजयासि पहा ।

हाय भगतसिंग , हाय हा ।

**कवि - स्वातंत्र्यवीर सावरकर**

**ई-साहित्य प्रकाशन**

ई अक्षर अंक क्र. १९ दि. २३ मार्च २००९

**संपादकीय-**

**२३ मार्च १९३०।** उणीपुरी २३ वर्ष वयाच्या **भगतसिंग, राजगुरू, आणि सुखदेव** यांना फ़ाशी देऊन ब्रिटिशांनी भारतीय क्रांतीची ज्योत मालवण्याचा प्रयत्न केला। पण

**केला जरी पोत बळेचि खाले**
**ज्वाळा तरी ती वरती उफ़ाळे**

या न्यायाने क्रांतीची ज्वाळा अजूनच भड्कली अन तिने अवघ्या ब्रिटीश साम्राज्याचा घास घेतला। भारत स्वतंत्र झाला। प्रगतीच्या पथावर निघाला।
पण ब्रिटीशांचे अर्धवट राहीलेले काम करायला आमचेच काही नेते सरसावले। स्वतःची तुंबडी भरण्यासाठी त्यांनी गरीब जनतेला वेठीस धरलं। लोकशाहीचा पुरेपूर फ़ायदा उठवणाऱ्या या नेत्यांनी पुन्हा ते दिवस आणले।
पण नवीन युवक नवीन स्वप्ने घेऊन आता बाहेर पड्ला आहे । कसल्याही प्रलोभनांना बळी न पडता नव्या आत्मविश्वासाने तो आता मार्गक्रमण करायला निघाला आहे।
नेटाक्षरीचा हा अंक शहीद भगतसिंग राजगुरू सुखदेव यांच्या स्मृतीला तर अर्पण आहेच। पण त्यांच्या हौतात्म्यापासून स्फूर्ती घेऊन नवीन भारताच्या उभारणीत आणि रक्षणासाठी कटीबद्ध असणाऱ्या लक्ष लक्ष युवकांना समर्पित।

**या अंकात वाचा**
**कवी आल्हाद काशीकर यांचे मनोगत**
**शहीदांना श्रद्धांजली कवितांची**
**नव्या युगाचा हुंकार : कवी कौस्तुभ आपटे**


यजमान संपादक –
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

अतिथी संपादक –
**आल्हाद काशीकर ( अमरावती )**

सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**
**सचिन काकडे (मुंबई )**
**सुरुचि नाईक ( नागपूर )**
**आनंद माने (सोलापूर)**
**सारंग भणगे (पुणे)**

# अतिथी संपादकांच्या लेखणीतून

भगतसिंग, राजगुरू, सुखदेव ही नावं कधीही एकमेकांपासून वेगळी केली जाऊ शकत नाहीत. राष्ट्रप्रेमाचे , त्यागाचे आणि धैर्याचे प्रतीक म्हणून ही नावं कायमची आमच्या मनावर कोरली गेली आहेत. भगतसिंग हे तर अतिशय बुद्धीमान आणि तार्किक होते. त्यांचं वाचन अतिशय चांगलं होतं. मार्क्सवादाचा त्यांच्यावर पगडा होता. त्यांचं एक पुस्तक फ़ार गाजलं. त्याचं नाव "मी नास्तिक का झालो ?" .
भारतीय स्वातंत्र्य लढ्यामध्ये दोन प्रवाह होते. एक जहाल तर दुसरा मवाळ. तसं बघितलं तर जगात जिथे कुठे लढे, आंदोलनं, उठाव होतात, क्रांत्या होतात तिथे सर्वत्र विविध विचारधारा अस्तित्वात असतातच. रशिया, इस्त्रायल, क्युबा, व्हिएतनाम सर्वत्र आम्हाला क्रांतिकारकांमध्ये , बंडखोरांमध्ये वैचारिक मतभेद दिसतात. मात्र वैचारिक मतभेद असले तरी एकमेकांच्या उद्दीष्टांबद्दल आदर असला पाहिजे. सर्व नद्या जशा एकाच सागराला मिळतात, तसेच सर्व आंदोलकांचे उद्दीष्ट एकच होते. ब्रिटिशांपासून भारताची मुक्तता. दुर्दवाने आमच्या देशात जहाल आणि मवाळ यांच्यात अतिशय संकुचित वैरभाव निर्माण झाला. टिळक - ग़ोखले वादापासून ते कांग्रेसवर कोणत्या गटाचे प्रभुत्व असावे इथपर्यंत स्पर्धा सुरु झाली. खरं तर जहाल असो वा मवाळ, त्यांना एकमेकांबद्दल अपार प्रेम आणि आदर वाटायला हवा होता, असे अपेक्षित होते. मात्र असे झाले नाही. भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांना फ़ाशी देऊ नये अशी सर्व भारतियांची इच्छा होती. दुर्दवाने तसे होऊ शकले नाही. गांधींवर देखील असा आरोप आहे की त्यांनी फ़ाशी रद्द होण्यासाठी फ़ारसॆ प्रयत्न केले नाहीत. स्वातंत्र्यानंतरही क्रांतीकारकांची उपेक्षाच झाली। त्यांना न्याय मिळू शकला नाही. निदान आता तरी त्यांच्या त्यागाची कल्पना जगाला यायला हवी.

ज्यांनी आपले जीवन , आपले सर्वस्व पणाला लावले, संसाराची राखरांगोळी केली, त्या क्रांतिकारकांच्या उद्दीष्टांबद्दल जेव्हा शंका घेतली जाते तेव्हा आमचॆ रक्त उसळले पाहिजे.
या ओळी सर्व क्रांतिकारकांना लागू होतात.

क्या मिला हमने कभी सोचा नहीं
लोग अमृत जांचकर पीते जहां
हमने जहरभी बिना पूछे पीया
क्या मिला हमने कभी सोचा नहीं

कुठलीही क्रांती यशस्वी झाली की कालचे क्रांतीकारक उद्याचे राज्यकर्ते होतात। उदा। लेनिन, फ़िडॆल कास्ट्रॊ , नेल्सन मंडेला . . . मात्र भगतसिंग़ सुखदेव राजगुरू या शहीदांना लोकांच्या हृदयात अढ़ळ स्थान मिळालं. मात्र सरकारी पातळीवर आपल्याच राज्यकर्त्यां नी उपेक्षित ठेवलं ही बोच कायम रहाणार आहे.

**--- आल्हाद काशीकर**

# क्रांतीवीरांनो

क्रांतीवीरांनो तुम्हांस वंदन
शत शत कोटी प्रणाम
वर्षभरातून एक दोनदा
देशभक्तीचे अम्हा उधाण

तसे आम्ही मनी वसवतो
देशप्रेम अमुच्या
एकमेकांनाच सांगतो
उपदेश आम्ही क्रांतीचा

अहा दिले ते स्वराज्य आम्हा
प्राणांची करुनी राख
सुराज्याचीही तुम्ही घातली
त्यावेळी हाक

स्वराज्यात आम्ही रमून गेलो
सुराज्य कसे अम्हा न ठावे
स्वार्थामागे धावत सारे
सुराज्य सांगा कसे पहावे

धर्मजातीच्या अजून बेड्या
सांभाळित आहोत
शाळांमध्ये उगाच ऐक्यगीत
शिकवित आहोत



दोष न माझा दोष न ह्याचा
दोष नसे कोणाचा
खुर्ची एके खुर्ची, खुर्ची दुने सत्ता
हाच एक परवचा

पहा कशी ही निद्रा आली
उघड्या डोळयांना
"मुक्त" तरी मग काय अडविते
अमुच्या पायांना

क्रांतीवीरांनो तुम्हास करितो
एक अता विनवणी
तनामनातुनी अमुच्या या हो
पुन्हा संचारुनी

स्वराज्याचा नभी सूर्य हा
तेजोमय राहू दे
सुराज्याची अखंड सरिता
भारत भू वर वाहू दे

**---सुरुची नाईक**
**(नागपूर)**

# सेझ आला । सेझ आला ।

Special Economic Zone (SEZ)आला की गावाचा कसा कायापालट होतो त्याची कथा

सेझ आला सेझ आला , पेपर वाल्याने बोंब ठोकली
हातातली कामं ठेऊन, सगळ्यांनी पोटभर झोकली

सोन्याचं अंडी देणारी, कोंबडी कापायची घाई झाली
चार गुंठे असणारांनाही , जमीन मापायची घाई झाली

शहाणे गायब झाले, येड्यांची गर्दी झाली
खिसे जड झाले अन अकलेला सर्दी झाली

मंगळसूत्र जाऊन, मोत्याचे हार आले
मंगळसूत्राचे धनी, बारबालेबरोबर फ़रार झाले

मुंग्यांची वाट लागली, बिळावर नागोबा बसले
शेळ्यांना नाट लागली, राखायला वाघोबा बसले

शाळेतली पोरं फ़टफ़ट्या उडवायला लागली
“चल मागे बस” , मास्तरणीला चिडवायला लागली

हरीनाम सप्ताह गेले, ढोलकीचा नाद आला
बियरच्या घोटासंगे, चिकनचा स्वाद आला

लहान्याच्या पाचवीला , बेंडबाजे वाजले
सत्यनारायण पुजेला, ऑरकेस्ट्रा गाजले

तरणे आणि म्हातारे, मसाजपार्लरमध्ये धुंद झाले
रक्ताचे भाऊ जमिनीसाठी, सुंद अन उपसुंद झाले

चहाचे ठेले गेले, परमिट रूम उभे राहिले
तिथल्या ललनांचे चाळे, डोळे भरून पाहिले

झकपक मॉलमध्ये चकाचक गाळे लागले
वाण्याच्या दुकानाला, भले मोठे टाळे लागले

भाषण करून दमले, नेत्यांना श्वास राहिला नाही
कष्ट करून जगावे यावर विश्वास राहिला नाही

जमिनीचे दर वाढले, पण मातीचा भाव गेला
कॉंक्रीटचे जंगल वाढले, त्यात गुदमरून गाव गेला

सेझ आला सेझ आला, एकच डंका झाला
अयोध्येसारखा गांव, रावणाची लंका झाला

**- हरिश दांगट**

# राजकारणी

वेदना भूमिपुत्रांची , वंचना अशिक्षितांची
गर्दी जीवघेणी, अपघातांचे बळी
सारी दुःखे मला वाटायची माझी
नव्हतो मी तेव्हा राजकारणी कुणी ।।१।।

दुःखी जनांनी, बेघर मुलांनी
गरीब बायांनी, हीन –दीनांनी
दिली प्रेरणा या साऱ्यांनी
सेवा तयांची करण्याची ।।२।।

करता सेवा समाजाची
स्वप्न वैभवाचे आले मनी
चला जमवुया झटपट माया
याचि देही याचि डोळा ।।३।।

कोण जाणे काय केली
मायेने या किमया
होतो गरीब तरी डोळस मी
झालो पुरता आंधळा ।।४।।

कष्टून - राबून खाण्याचे
दिवस आता गेले हो
चार पावले चालतानाही
पाय माझे थकले हो ।।५।।

फ़िरतो घेऊन आलिशान गाडी
घरी दारी नोकर मंडळी
ऐश्वर्य आता लोळते घरी
फ़िकीर कशा मग मज कोणाची ।।६।।

भ्रष्टाचार अन वशिलेबाजी
झटपट सारी “कामे” करिती
राहिलो न आता माणूस मी
मलाच झालो परका मी ।।७।।

विसर पडला आहे मजला
बांधवांच्या उत्कर्षाचा
विचार नाही शिवत मनाला
समाजाच्या सेवेचा ।।८।।

वाटत नाही सुटतील आता
प्रश्न हे राष्ट्रामधले
सुटला मात्र प्रश्न माझा
अन्य कर्तव्यचि न उरले ।।९।।

**--मंजिरी ढेरे**

## व्यस्त तुझे शहझादे

अम्हां न काही देणे घेणे
तमा न भवितव्याची
काय जन्म हा फुका घालवू
लढून मरण्यासाठी ?

सुखे आमुची वैषयिक
ही उपभोगाया जगतो
अपुले घरटे अपुले विश्व
अपुल्या पुरते जपतो

कसला खुळचट भगतसिंग
अन वेडा बाबू गेनू
कसली करता क्रांती ? आम्ही
सगळे खुशालचेंडू

व्यर्थ रिकाम्या बाता सगळ्या
स्फुरण न कोणाला ते
पाहून जाणून दुर्लक्षितो परि
शरम न कुणास वाटे

आक्रंदन हे कोण ऐकतो
तुझे ग धरणीमाते
आपण अपुल्या जगात सगळे
व्यस्त तुझे शहझादे

**---रणजित पराडकर**
**(औरंगाबाद)**

# एक डाव हरलेला

एका चेंडूत जिंकण्यासाठी
सतरा धावा
त्या सतरा धावांचं ओझं घेऊन
एक निष्पाप उतरतो मदानात
त्याला तो चेंडू खेळायचाय

आणि परतायचंय
सोबत एक पराभव घेऊन

समोर शत्रूचे १५० जवान
बंदुकीमध्ये उरलेली
एक शेवटची गोळी
आणि लपवण्यासाठी उरलेला
सहकार्यांच्या प्रेतांचा आडोसा
त्याला ती गोळी चालवायचीय

आणि परतायचंय
सोबत एक पदवी घेऊन

"शहीद"

**कवी ----खेळाडू**

# हे घ्या अखेरचे श्वास माझे

(.२६ नोव्हेंबर २००८। पोलीसांच्या शहादतला सलाम)

हे घ्या अखेरचे आता श्वास दान माझे
मी राखतो पुन्हा मत्युशी ईमान माझे

क्षण येत — जात होते माझे जगायचे पण
तेव्हा मिटून गेले हळुवार पान माझे

मज आग ही विचारी "का व्यर्थ त्याग केला ?"
तेव्हा कुठे मला पण होतेच भान माझे !

मज दुःख वाटले ना या फ़ाटक्या खिश्याचे
म्हणतात लोक सारे हे त्याग शान माझे

मी एकटा निघालो त्या शांत माळरानी
भरले कसे फ़ुलांनी ओसाड रान माझे

लोकांस बंद साऱ्या केले जरी तयांनी
करतील का ईरादे ते बंदीवान माझे

आता भविष्य सारे ठेवून घे तुझ्याशी
रे भूतकाळ झाले, हे वर्तमान माझे

- **हृशिकेष चुरी**

## मी रस्त्यावर उतरलो

मी उन्चवला झेंडा, मी रस्त्यावर उतरलो
मी दुकाने तोडली नाही
मी गाडी रोखली नाही
मी छाती आणि झेंडा घेऊन , पुढे सरसावलो
मी रस्त्यावर उतरलो

कुणी “वेडा” उपमा दिधली
मजभवती गर्दी जमली
कुणी शामिल झाले नाही
माझ्या मागे आले नाही
मी नजर ठेवली सरळ आणि लोकाच्या गर्दीत शिरलो
मी रस्त्यावर उतरलो

कुठलाच निषेध नव्हता
विरोध कुणाचा नव्हता
कुणी “भाषा प्रदेश” नाही
आणि धर्मादेश नाही
मी मंदिर मस्जिद चर्च न्यायालय कुठेच ना थांबलो
मी रस्त्यावर उतरलो

कुण्या पक्षाचा झेंडा नव्हता
हिरवा वा भगवा नव्हता
मी नारे फ़ोडले नाही
जिंदाबाद ओरडलो नाही
तरी झेंड्यासमोर शतशतदा , मी नतमस्तक झालो
मी रस्त्यावर उतरलो

मैदानी रोवला मी झेंडा
तीन पावले मागे आलो
“आई आलो आज एकटा”
परत तिला नतमस्तक झालो
मागे वळलो, अनंत गर्दी
दृष्टी सर्व झेंड्यांवरती
आदर त्यांच्या नजरेमध्ये
राष्ट्रगीत ही ओठांवरती



मी भारतभूला वंदन करुनी गर्वांकित झालो
आम्ही  रस्त्यावर उतरलो
आम्ही  रस्त्यावर उतरलो
आम्ही रस्त्यावर उतरलो !!!

**अंबरीश देशपांडे**
**(अमरावती)**

# भंपऽप भपम भपम

भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

वेगात जाऊ म्होरं, सुटलेला जसा तीर
रोखेल काय कुणात काही दम काही दम
रंगेल सारं जग , आपुल्या रंगातुन
एकेक पडूदे कदम, रे कदम
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

नवीन आमुची ही गाणी रे
नवीन आमुचा हा सूर
पटली तर द्या हाताला टाळी रे
नाही तर हटा जरा दूर
आले रे वारे, आरुढ व्हा रे
पसरवुया आपुले तरंग रंग रंग रंग
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

नव्याने मापे जुनी तोलुया
येते का पहा तिथे घट
फुटलेल्या कंठाने बोलुया
उपयोगी नाही कुजबुज
खोट्या जगाची, कोत्या दुनियेची
उडवुया चला दाणादाण द्‌ण द्‌ण द्‌ण
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

"प्रिझमा"तुन इंद्रधनू सारुया
दावुया "एक" कसा रंग
दगडातुन देवाला काढुया
घेऊया त्यालाही संग
कसली रे भिती रोखठोक निती
मिरवा या ध्वजाचे पतंग तंग तंग तंग
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

मिटलेल्या दारांना दे धडक
वारे हे आत घुम घुमू दे
मेघांना गीत द्या हे बेधडक
बरसू दे आणि गडगडू दे
वाजव रे घंटा , पिटवुया डंका
होऊ दे नाद जरा घण घण घण घण
भंपऽप भपम भपम भंपऽप भपम भपम
भंपऽप भपम भपम भम भपम भम

**कौस्तुभ आपटे**
**(डोंबिवली)**

# अतिथी संपादकांची ओळख



**आल्हाद काशीकर** हे एक बहुआयामी पैलूदार व्यक्तीमत्त्व. आल्हादच्या साहित्यिक पैलूचं वर्णन करायचं झालं तर तो एक खऱ्या अर्थाने मुक्त लेखक आहे. चिंतनशीलता हा त्याच्या लिखाणाचा स्थायीभाव आह. त्याच्या कविता वाचल्यावर आपल्याला विशेषत्वाने  हे जाणवत रहाते। एकूणच मानवी जीवनाचा , जन्म-मत्यु , धर्म, समाज, प्रथा-परंपरा, व्यवस्था या समस्यांचा एक चिकित्सक विचार आल्हादच्या कवितेतून आपल्याला दिसतो. म्हणूनच “अंतर्नाद” या आपल्या काव्यसंग्रहातल्या एका कवितेत तो मोठ्या सहजतेने एक कठीण प्रश्न विचारतो. . .

**जेव्हा धर्म नव्हता तेव्हा**
**माणसं काय अधर्मानं वागत होती ?**

चिंतनशीलतेबरोबरच एक अपार करुणा आणि अफ़ाट सामाजिक बांधिलकी ही सुद्धा त्याच्या लिखाणाची खूप महत्त्वाची वशिष्ट्यं आहेत, जी, मला वाटतं, त्याच्या स्वभावातील प्रचंड संवेदनशीलतेमुळे आली आहेत. ऊर्दूतील प्रसिद्ध शायर जनाब निदा फ़ाजली यांच्या हस्ते त्याच्या “अंतर्नाद” चं प्रकाशन झालं, तेव्हा आल्हादच्या कवितांबद्दल बोलताना ते म्हणाले, “गालीबने कहा है - आदमी को मयस्सर (सोपं) नहीं इन्सां होना – तो ये जो आदमी से इन्सान तक का सफ़र है इस यात्रा में आल्हादकी कविता निश्चित रूपसे आपका साथ दे सकती है।” त्याची कविता सडेतोडपणे समाजातील व्यंगांवर बोट ठेवते।   सर्व प्रकारच्या खोटेपणाची आणि दांभिकतेची चीड त्याच्या कवितेतून जाणवत रहाते.

## त्यांचे पुतळे उभारले जगाने

श्रद्धा सुमने वाहून आता
जे गेले ते येणार  नाहीत

वाहिलेले आयुष्य त्यांचे
पुन्हा परतून येणार नाही

ते होते तेव्हा आम्ही
त्यांना जगणे असह्य केले

ते गेले आता त्यांची
सर कुणाला येणार नाही

काळ कोणताही असो
थोरांची उपेक्षाच झाली

काळ कोणताही असो
सामान्य बदललेच नाहीत

सर्वस्व पणाला लावले त्यांनी
जग बदलण्याच्या ध्यासाने

त्यांचे पुतळे उभारले जगाने
स्वतः मात्र बदलले नाहीत

**--आल्हाद काशीकर**

आल्हादने आजवर समाजातल्या अनेक समस्यांवर अभ्यासपूर्ण लेख लिहीले आहेत. मेळघाटचं कुपोषण , शेतकरी आत्महत्या या विषयांवरचे त्याचे लोकसत्तामधले लेख खूप गाजले। मेळघाट कुपोषण - समस्या- कारणे व उपाय हा लेख वाचून मुंबई दूरदर्शनने त्याला "घटनाचक्र" या कार्यक्रमात वक्ता म्हणून बोलावले होते.

आल्हादचे व्यक्तीगत आयुष्यही त्याच्या लिखाणाशी सुसंगत आहे . B Com. M.A (Sociology) , MBA (Marketing). असे शिक्षण घेतल्यानंतर त्याने चक्क शेती करायला सुरुवात केली. तीही विदर्भातल्या जमिनीवर। एक सामाजिक प्रयोग म्हणून. "सांदिपनी" हा त्याचा वनौषधी प्रकल्प आहे. या प्रयोगासाठी त्याची राष्ट्रीय पातळीवर भारतातील पहिल्या पाच उदयोन्मुख उद्योजकांत पुरस्कारासाठी निवड झाली होती. आणि हे करत असतानाच तो हिमाचल प्रदेशातील बटाटा उत्पादक शेतकयांमध्ये संगठन उभेही करतो आहे. तेही त्यांच्यातच राहून.

आल्हाद गायक आहे. संगीतकार आहे. आल्हाद गझल गायनाचे कार्यक्रम करतो. त्याने स्वतः कंपोज केलेल्या जांनिसार अख्तर, निदा फ़ाजली अशा नामवंत शायरांच्या गजलांचा अल्बम लवकरच प्रसिद्ध होणार आहे. जावेद अख्तर, निदा फ़ाजली यांचे आशिर्वाद त्याला लाभले आहेत. कार्ल मार्क्स , नेल्सन मंडेला, म गांधी अशा लोकोत्तर पुरुषांवर, तसेच इस्त्रायलच्या संघर्षावर आल्हाद जनजागृतीपर व्याख्याने देतो.
अशा असंख्य गोष्टी उत्कटतेने करणारा तरूण संपादक आज आपल्या नेटाक्षरीला लाभला हे आपले भाग्यच. आयुष्य उत्कटतेने कसे जगावे, आजच्या काळात भगतसिंग राजगुरू सुखदेव यांच्या आदर्शाने कसे जगावे याचाच जणू तो एक मूर्तीमंत धडा आहे. जीवनाची क्षणभंगूरता त्याला आतवर जाणवली आहे. आणि आत्मशोधाबरोबरच एका स्वच्छ , मुक्त, निखळ, माणसाचा , व्यवस्थेचा शोध आणि निर्मिती हा त्याचा ध्यास आहे.
आमचे एक मित्र समीर सामंत एकदा मला म्हणाले, " मी आजवर समजत होतो, मनासारखं आयुष्य जगायला नशीब लागतं. पण आता मला कळलं त्यासाठी आल्हादसारखी जिगर लागते."

नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. आपल्याला हा अंक नियमित दर आठवड्याला विनामूल्य, मिळण्यासाठी खालील आयडी वर आपला आयडी नोंदवावा.
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.
आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .

netaksharee@gmail.com